**मा.सर्वोच्च न्यायालयाने स्थापन केलेल्या रस्ते सुरक्षा समितीच्या निर्देशानुसार रस्त्यांच्या कामांना प्रशासकीय मान्यता देताना करावयाची रस्ते सुरक्षा निधीची तरतूद करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- संकिर्ण २०१७/ प्र.क्र.१८/ रा.म.२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २७ फेब्रुवारी, २०१७

वाचा :- शासन परिपत्रक क्रमांक संकिर्ण १०२००९/ सीआर-३/ नियोजन-३,
दि.२२ फेब्रुवारी, २००१.

**प्रस्तावना :-**

देशातील अपघात संख्येवर नियंत्रण आणण्यासाठी मा.सर्वोच्च न्यायालयाने निवृत्त न्यायमूर्ती राधाकृष्णन यांच्या अध्यक्षतेखाली रस्ता सुरक्षा समिती स्थापन केली असून सदर समितीकडून रस्ते सुरक्षाविषयक उपाययोजना करणेबाबत वेळोवेळी निर्देश दिले जातात व सदर निर्देशांच्या राज्य शासनामार्फत होणा-या अंमलबजावणीचा नियतकालीक आढावा घेतला जातो. सदर रस्ता सुरक्षा समितीच्या निर्देशास अनुसरून रस्त्यांच्या कामांना प्रशासकीय मान्यता देताना रस्ते सुरक्षा निधीची तरतूद खालील परिपत्रकान्वये करण्यात येत आहे.

**परिपत्रक :-**

इमारती, रस्ते व पूलांच्या कामांची अंदाजपत्रके तयार करीत असताना, अंदाजपत्रक गोषवारामध्ये टक्केवारी स्वरुपात करावयाच्या तरतूदी कशा प्रकारे करण्यात याव्यात यासंबंधीचे निर्देश संदर्भीय परिपत्रकान्वये प्रसृत करण्यात आले आहेत.

त्याव्यतिरिक्त सा.बां.विभागामध्ये रस्त्यांविषयीच्या रु. १० कोटी पेक्षा जास्त अंदाजित किमतीच्या कामांचे संकल्पन व अंदाजपत्रक, कार्यान्वयन, कार्यपूर्ती व परिरक्षण ह्या ४ टप्प्यांवर रस्ते सुरक्षा परिक्षण (Road Safety Audit) अनिवार्य करुन त्यासाठी प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकात रस्ते सुरक्षा परिक्षण कामास १ टक्का तरतूद करण्यात यावी. तसेच अंदाजपत्रकीय स्तरावरील रस्ते सुरक्षा परिक्षण (Road Safety Audit) यामध्ये सुचविलेल्या सर्व व्यवहार्य बाबींचा सविस्तर अंदाजपत्रकामध्ये समावेश करण्यात यावा व तसे केल्याची नोंद घेतल्यानंतरच मुख्य अभियंता यांनी अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

सदर शासन परिपत्रक आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२२८१६३८४९१८१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pradeep E Dalvi

Digitally signed by Pradeep E Dalvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PWD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=716d09513325160a8ae457d38bdb1108a805f4db1fec141f11bc887b7810d338, cn=Pradeep E Dalvi
Date: 2017.02.28 16:41:21 +05'30'

**(प्रदीप दळवी)**

अवर सचिव(रा.म.), महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री(सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक.
४. प्रधान सचिव, परिवहन विभाग यांचे स्वीय सहायक.
५. सचिव(रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक.
६. सचिव(बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक.
७. परिवहन आयुक्त, परिवहन आयुक्त कार्यालय, प्रशासकीय इमारत, वांद्रे(पूर्व), मुंबई-५१.
८. मुख्य अभियंता व सह सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
१०.आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सर्व उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
१३.सर्व अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
१५.सर्व कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
**१६**.निवडनस्ती(रा.म.२).